**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी मुंबई,**
**येथील मिनी थिएटर प्रायोगिक नाटकासाठी**
**सवलतीच्या दरात उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पुलदे-२०१६/प्र.क्र.१७०/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :** (१) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुलदे-२०१३/प्र.क्र.१३४/सां.का.२, दि.०३.०३.२०१५.
(२) शुध्दीपत्रक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.पुलदे-२०१३/प्र.क्र.१३४/सां.का.२, दि. ०४.०६.२०१५.
(३) प्रकल्प संचालक पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र.आस्थापना/२०१७/४५४६, दि.०४.०७.२०१७.
(४) प्रकल्प संचालक पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र.आस्थापना/२०१७/४६१६, दि.२७.०७.२०१७.

**प्रस्तावना -**

शासनाने संदर्भ क्र. १ येथील दि.०३.०३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतील रवींद्र नाट्य मंदिर, मिनी थिएटर इत्यादी यांचे सुधारीत भाड्याच्या दरास मंजूरी दिली होती व यासंदर्भातील अटी व शर्ती निश्चित केल्या होत्या. तद्नंतर संदर्भ क्र. २ येथील दि.०४.०६.२०१५ च्या शुध्दीपत्रकान्वये संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात काही सुधारणा करण्यास मान्यता देण्यात आली होती.

२. मुंबई व ठाणे महानगरपालिकेच्या अधिपत्याखालील नाट्यगृहाकडून प्रायोगिक नाटकासाठी नाट्यगृहाच्या भाडयात ५०% सवलत देण्यात येते. त्याच धर्तीवर पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या मिनी थिएटरच्या भाड्यामध्ये प्रायोगिक नाटकांसाठी ५०% सवलत देण्याबाबत नाट्यसंस्थांकडून मागणी करण्यात येत आहे. सदर मागणीच्या अनुषंगाने अकादमीतील मिनी थिएटरची प्रत्येक महिन्यात दोन सत्र प्रायोगिक नाटकांसाठी ५०% सवलतीच्या दरात देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** -

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीतील मिनी थिएटरची प्रत्येक महिन्यात दोन सत्रे (सत्र उपलब्धतेनुसार) प्रायोगिक नाटकांसाठी ५०% सवलतीच्या दराने देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय व संदर्भ क्र. २ येथील

शुध्दीपत्रक याद्वारे निश्चित केलेल्या आवश्यक अटी/शर्ती व कार्यपध्दती लागु राहील. त्याच बरोबर खालील अटी राहतील.

अ) नोंदणीकृत असलेल्या प्रायोगिक नाट्य संस्थांना योग्य ते प्रमाणपत्र सादर केल्यानंतर सदर सवलत देण्यात येईल.

आ) राज्यशासनाच्या अथवा राज्य स्तरावरील नाट्य स्पर्धेतील पारितोषिक विजेत्या प्रायोगिक नाटकांना सदर सवलत देण्यात येईल.

इ) सदर सवलत त्या सत्राला असणाऱ्या दराच्या ५०% असेल. तसेच अन्य कर स्वतंत्रपणे आकारण्यात येतील.

ई) प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य या तत्वावर ही सवलतीची सत्रे देण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२११७२११२११२३ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Basawaraj Gurapadappa Saidanawaru

Digitally signed by Basawaraj Gurapadappa Saidanawaru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d6e0176dd9f18c05af2af6161c960ec128aedd0d596986c8dfe46407b1ecbc13, serialNumber=0c50ec125ac79b1ecf0a06b6a256996713c819ae428f2e0aabe4415bbcaf5a54, cn=Basawaraj Gurapadappa Saidanawaru
Date: 2017.08.21 17:11:41 +05'30'

**( ब.गु.सैदानवरु )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
३) प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक.
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (प्रसिध्दीकरीता)
५) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) निवड नस्ती, सां.का.२.